**शासकीय विद्या महिला वसतिगृह, लातूर या या संस्थेसाठी भाडयाने घेतलेल्या इमारतीच्या इमारत भाडे प्रस्तावास मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग.**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०१९/प्र.क्र.२२३/कार्या-२,**
नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक - १३ जुलै २०२०

वाचा :-

१. उपायुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जा.क्र.मबाविआ/मवि/शाविमवि/ इमारत भाडे प्रस्ताव/५०२०/का-६/१७-१८, दि.११.१०.२०१९.
२. उपायुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जा.क्र.मबाविआ/मवि/शाविमव/ इमारत भाडे/३६९/प्रस्ताव/त्रुटी/का-६/२०१९-२०, दि.१४.१.२०२०.

**प्रस्तावना -:**

शासकीय विद्या महिला वसतिगृह, लातूर ही संस्था नेताजी नगर, लातूर येथे येण्यापूर्वी श्री. प्रभाकर गोविंद चामे यांच्या मालकीच्या इमारतीमध्ये दि. ०१.०१.२०१३ ते दि. ३१.०८.२०१८ पर्यंत कार्यरत होती. सदर इमारत मूळ मालकास खाजगी कारणास्तव आवश्यक असल्याने, ती रिकामी करुन देण्याबाबत घरमालकाने नोटीसीद्वारे कळविल्याने, जिल्हा महिला बाल विकास अधिकारी, लातूर यांनी शासकीय विद्या महिला वसतिगृहास श्री. हंसराज धोंडीराम सोमवंशी नेताजी नगर, लातूर यांच्या स्वमालकीच्या सिटी सर्वे नं. २०९, घर क्रमांक आर-२/२३९/नेताजी नगर, लातूर, इमारत क्षेत्रफळ ५९४.५९ चौ.मी. येथे स्थलांतर करण्यास दि. ०१.०९.२०१८ पासून ३१.०८.२०२३ पर्यंत ५ वर्षाकरीता अनुमती दिलेली आहे.

अधिक्षक, शासकीय विद्या महिला वसतिगृह, लातूर यांनी घरमालकासोबत सहदुय्यम निबंधक वर्ग-२ या कार्यालयामध्ये जागा वापरण्याचे थेट परवाना पत्राची (leave and license agreement) नोंदणी केली आहे. कार्यकारी सार्वजनिक बाधंकाम विभाग, लातूर यांच्या इमारत वाजवी भाडे प्रमाणपत्रानुसार सदर इमारतीच्या भाडयापोटी दरमहा रु. ८१,३६१/- इतके भाडे इमारत मालकास अदा करण्यात येणार आहे . तसेच कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर यांनी वसतीगृहासाठी सन २०१७-१८, २०१८-१९, २०१९-२० या वर्षासाठी जागा उपलब्ध नसल्याचे प्रमाणपत्र दिले आहे . सदरचे भाडे हे वार्षिक नगरपरिषदे / ग्रामपंचायत कर, पाणी पुरवठा व वीज इ. सेवा खर्च वगळून ठरविण्यात आले आहे. इमारतीचा स्थानिक कर, मालमत्ता कर मालक भरणार असून पाणीपट्टी व विद्युत देयके भाडेकरु म्हणजेच शासकीय विद्या महिला वसतिगृह, लातूर यांनी अदा करायचे आहे. सद्यस्थितीत संस्थेमध्ये मागील पाच वर्षात महिनेनिहाय सरासरी उपस्थिती २४ प्रवेशिता असून उस्मानाबाद व बीड जिल्हयात शासकीय राज्यगृह नाही. तसेच शासनाचे स्वाधार योजनेच्या नवीन मार्गदर्शक सुचनेनुसार जिल्हयातएक संस्था राहणार आहे. त्यामुळे प्रवेशितांची संख्या वाढत आहे.

शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील, उपविभाग-१, अनु.क्र.१०, मुंबई वित्तीय नियम १९५९ अंतर्गत प्रदान वित्तीय अधिकार आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम-१९६५ मधील नियम (क) खालील टीप-१ अन्वये मुंबई, नवी मुंबई, ठाणे, पुणे, पिंपरी-चिंचवड, नागपूर व औरंगाबाद येथील इमारती वगळता, अन्य प्रदेशातील प्रत्येक कार्यालयीन इमारतींसाठी प्रति माह रु.५०,०००/- पर्यंत भाडे मंजुरीचे अधिकार, विभाग प्रमुख यांना आहेत व त्यावरील भाडे मंजुरीचे पूर्ण अधिकार प्रशासनिक विभागास असल्याने सदर प्रस्ताव आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यास अनुसरुन शासकीय विद्या महिला वसतिगृह, लातूर या महिला वसतिगृहासाठी भाडयाने घेण्यात आलेल्या इमारतीचे, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर यांनी प्रमाणित करुन दिल्याप्रमाणे सर्व कर वगळून दिनांक ०१.०९.२०१८ पासून दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंतच्या कालावधीतील दरमहा रु.८१,९६१/- (चौऱ्यांऐंशी हजार नऊशे एकसष्ट फक्त) इतके भाडे मंजूर करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय -:**

उपरोक्त पार्श्वभूमीवर शासकीय विद्या महिला वसतिगृह, लातूर या महिला वसतिगृहासाठी भाडयाने घेण्यात आलेल्या इमारतीचे, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर यांनी प्रमाणित करुन दिल्याप्रमाणे सर्व कर वगळून दिनांक ०१.०९.२०१८ पासून दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंतच्या कालावधीतील दरमहा रु.८१,९६१/- (चौऱ्यांऐंशी हजार नऊशे एकसष्ट फक्त) इतके भाडे मंजूर करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. शासकीय विद्या महिला वसतिगृह, लातूर या वसतिगृहाकरीता भाडयाने घेतलेल्या इमारतीचा तपशील खालीलप्रमाणे :-

| अ.क्र. | इमारत भाडे मालकाचे नाव | इमारतीचे क्षेत्रफळ | दरमहा प्रमाणित केलेले भाडे | ताबा घेतल्याचा दिनांक | मंजूर करावयाचे दरमहा एकुण भाडे व कालावधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. हंसराज धोंडीराम सोमवंशी नेताजी नगर, लातूर. | सिटी सर्वे नं. २०९, सिटी सर्वे नं. २०९, घर क्रमांक आर-२/२३९/ नेताजी नगर, लातूर . इमारत क्षेत्रफळ ५९४.५९ चौ.मी | रु. ८१,९६१ | ०१.०९.२०१८ | रु. ८१,९६१/- (सर्व कर वगळून) दि.०१.०९.२०१८ ते दि.३१.०८.२०२३ |

३. उपरोक्त प्रयोजनासाठी अधिक्षक, शासकीय विद्या महिला वसतिगृह, लातूर यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत असून त्यांनी सदर वसतिगृहासाठी यापूर्वी भाडयाची रक्कम संबंधितांस अदा केली असल्यास ती रक्कम समायोजित करुन उपरोक्तप्रमाणे भाडयाची रक्कम नियमानुसार अदा करण्यात यावी. तसेच इमारत भाडे करारपत्रात नमूद केलेल्या सर्व अटीशर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. या वसतीगृहासाठी भाडयाने घेतलेल्या इमारतीचे भाडे श्री. हंसराज धोंडीराम सोमवंशी नेताजी नगर, लातूर यांना रेखांकीत धनादेशाद्वारे समसमान देय राहील याचबरोबर सदर मालकास भाडे अदा करताना आयकर विषयक असणाऱ्या स्त्रोताच्या कपातीबाबत (Tax deducted at source ) आहरण व संवितरण अधिकारी यांनी नियमानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. सदरचा खर्च मागणी क्रमांक- एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, या प्रधानशिर्षांतर्गत ०२, समाज कल्याण, १०३- महिला कल्याण, (०१) महिला कल्याण योजना, (०१) (०१) स्वागत केंद्रे, राज्य गृहे व संरक्षण गृहे (अनिवार्य) - (२२३५१२५४) या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

६. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख करण्यात आलेल्या नियमांचे आणि यासंदर्भात वित्त व नियोजन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश,सूचना, परिपत्रके, अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करावे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ मधील तरतुदीनुसार शासन नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग १ मधील अ.क्र. १०, नियम क्र. ११५ , मुंबई वित्तिय नियम १९५९ अंतर्गत प्रदान वित्तिय अधिकार आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील नियम १४७ (क) खालील टिप १ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्तथळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००७१३१६१०२१६०३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAVINDRA
SITARAM
JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85,
postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA,
serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.07.13 16:31:30 +05'30'

**( र.सि.जरांडे)**
**उप सचिव (अ.का.), महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, महिला व बाल विकास यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १ / २ मुंबई / नागपूर
६. सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास,
७. अधिदान व लेखा कार्यालय, लातूर.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, लातूर.
९. वरिष्ठा कोषागार अधिकारी, पुणे.
१०. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, लातूर.
११. अधिक्षक, शासकीय विद्या महिला वसतिगृह, लातूर.
१२. कक्ष अधिकारी, कार्यासन-४, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व अधिकारी/कार्यासने, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती ( कार्यासन-२ )